**<u>सिंचन व बिगरसिंचन पाणीपट्टीच्या</u>**

**<u>थकबाकीत सवलत देण्याबाबत.</u>**

# महाराष्ट्र शासन

**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १०१०/ २१३/ १०/ सिं व्य धोरण**

**जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.**

**दिनांक - २८-२-२०११.**

**<u>प्रस्तावना</u> -**

<u>सिंचन व बिगरसिंचन पाणीपट्टी आकारणी</u>

महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम, १९७६ कलम ४६ (२) नुसार, सिंचन व बिगर सिंचन पाणीवापराबाबत पाणीपट्टी आकारली जाते.

<u>सिंचन व बिगरसिंचन विलंब आकारणी</u>

महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम, १९७६ कलम ८८ (१) नुसार, सिंचन व बिगरसिंचन विलंब आकारणी आकारली जाते.

<u>सिंचन व बिगरसिंचन दंडनीय आकारणी</u>

जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १००२/ २०९/ ०२/ सिं व्य धोरण, दिनांक २३-१२-२००२ नुसार, मुंबई कालवे नियम, १९३४ नियम २३ व नियम २५ मध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने, दंडनीय आकारणी आकारली जाते.

<u>सिंचन व बिगरसिंचन पोकळ पाणीपट्टी आकारणी</u>

जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १००१/ ३७८/ ०१/ सिं व्य धोरण, दिनांक २१-११-२००२ मधील, सिंचन पाणीवापराच्या प्रारुप करारनाम्यातील मुद्दा क्रमांक ८ नुसार, सिंचन पोकळ पाणीपट्टी आकारणी आकारली जाते.

जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक बिपापु १००१/ ७१३/ ०१/ सिं व्य धोरण, दिनांक ११-६-२००३ मधील, बिगरसिंचन पाणीवापराच्या प्रारुप करारनाम्यातील मुद्दा क्रमांक ११ (१) नुसार, बिगरसिंचन पोकळ पाणीपट्टी आकारणी आकारली जाते.

सिंचन व बिगरसिंचन पाणीवापरासाठी एकदा थकबाकीदार झालेल्या लाभधारकास त्याने संपूर्ण थकबाकी भरेपर्यंत व पुढील परवानगी न मिळता तो पाणी घेत राहिल्यास पाणीवापरावर दंडनीय आकारणी होते. त्याचप्रमाणे विलंब आकारणी देखील होते. तसेच लाभधारकाने पाणीआरक्षणापेक्षा कमी पाणी वापरले असतांनादेखील त्याला मंजूर पाणीआरक्षणाच्या अनुषंगाने पोकळ पाणीपट्टी भरावी लागते. अशाप्रकारे त्याच्या थकबाकीवर विविध आकारण्या होत असल्यामुळे त्याची थकबाकी वाढत गेल्यामुळे थकबाकी न भरण्याकडे लाभधारकांचा सर्वसाधारणपणे कल दिसून येतो. अशी पाणीपट्टी भरण्यास लाभधारक नाखूष असतात.

यापूर्वी शासनाने सिंचन पाणीपट्टी थकबाकीत सवलत देण्याबाबत दिनांक २९-१०-१९८७, २९-३-१९८९, ४-९-१९९६, २-४-२००२, २६-२-२००४ रोजी शासन निर्णय निर्गमित केले होते. त्याचप्रमाणे बिगरसिंचन पाणीपट्टी थकबाकीत सवलत देण्याबाबत दिनांक २६-२-२००४ रोजी शासन निर्णय निर्गमित केला होता. सदर शासन निर्णयांना पुरेसा प्रतिसाद लाभला नाही. त्यामुळे सिंचन व बिगर सिंचन पाणीपट्टी थकबाकी वाढत चालली आहे. सदर थकबाकीची वसूली होण्याच्या दृष्टीने, थकबाकीत काही प्रमाणात सवलत देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**<u>शासन निर्णय</u> -**

मा. मंत्रीमंडळाने प्रस्तुत प्रस्तावास, दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने, पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहेत.

१. दिनांक १-४-२०१० रोजी प्रलंबित असलेल्या सिंचन लाभधारकांच्या, सिंचन पाणीपट्टी थकबाकीपैकी, पोकळ पाणीपट्टी व पोकळ पाणीपट्टीवरील विलंब आकारणी माफ करण्यात येत आहे.

२. दिनांक १-४-२०१० रोजी प्रलंबित असलेल्या, महानगरपालिका, नगरपालिका, ग्रामपंचायती वगैरे संस्थांच्या, पिण्याच्या पाण्याच्या योजनांच्या पिण्याच्या पाण्यासंबंधीच्या, बिगरसिंचन पाणीपट्टी थकबाकीपैकी, पोकळ पाणीपट्टी व पोकळ पाणीपट्टीवरील विलंब आकारणी माफ करण्यात येत आहे.

३. दिनांक १-४-२०१० रोजी प्रलंबित असलेल्या औद्योगिक पाणीवापरासाठीच्या, बिगरसिंचन पाणीपट्टी थकबाकीपैकी, पोकळ पाणीपट्टी व पोकळ पाणीपट्टीवरील विलंब आकारणी वगळता, उर्वरित रक्कम भरण्याच्या अटीच्या अधीन राहून, पोकळ पाणीपट्टी व पोकळ पाणीपट्टीवरील विलंब आकारणीची रक्कम माफ करण्यात येत आहे.

याकरिता क्षेत्रिय कार्यालयांमार्फत खालीलप्रमाणे पध्दत अवलंबिण्यात यावी.

अ. <u>सिंचन पोकळ पाणीपट्टी माफ करण्याची पध्दत</u> -

क्षेत्रिय स्तरावरील कार्यकारी अभियंता यांनी, शेतक-याचे नाव, गट, पोकळ पाणीपट्टी, पोकळ पाणीपट्टी आकारणीवरील विलंब आकारणी यांचा समावेश करुन याबाबतचे सविस्तर कार्यालयीन आदेश काढावेत. यासाठी शेतक-यांनी, पाणीवापर संस्थांनी अर्ज करण्याची आवश्यकता नाही. सदरहू आदेश काढल्यानंतर, विभागाच्या सिंचनाच्या थकबाकीच्या खतावणी नोंदवहीमध्ये, वरील आदेशाचा उल्लेख करुन ही रक्कम कमी करण्यात यावी. सदर कार्यवाही ही शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून ६ महिन्यांच्या मुदतीत पूर्ण करावी.

ब.  <u>बिगरसिंचन पोकळ पाणीपट्टी माफ करण्याची पध्दत</u> -

क्षेत्रिय स्तरावरील कार्यकारी अभियंता यांनी, बिगरसिंचन पाणीपट्टी थकबाकीदारांची यादी तयार करावी. शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून १ महिन्याच्या आत यादी तयार करुन थकबाकीदारास कळवावे. पाणी वापरणा-या संस्थांचे नाव, घरगुती किंवा औद्योगिक पाणीवापर प्रकार, पोकळ पाणीपट्टी, पोकळ पाणीपट्टी आकारणीवरील विलंब आकारणी यांचा समावेश करुन याबाबतची सविस्तर यादी शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून १ महिन्याच्या आत तयार करावी व याबाबत संबंधितास कळवावे. यासाठी पाणी वापरणा-या संस्थांनी अर्ज करण्याची आवश्यकता नाही.

तथापि, दिनांक ३१ मार्च, २०१० पर्यंतच्या बिगरसिंचन पाणीपट्टी थकबाकीपैकी, पोकळ पाणीपट्टी व पोकळ पाणीपट्टीवरील विलंब आकारणी वगळता, उर्वरित रक्कम भरण्याच्या अटीच्या अधीन राहून, त्याची पोकळ पाणीपट्टी व पोकळ पाणीपट्टीवरील विलंब आकारणीची रक्कम माफ करण्यात येईल, असे प्रत्येक थकबाकीदाराला कळवावे. तो जर त्याच्याकडील ही रक्कम, नोटीस दिल्यापासून तीन महिन्यात भरण्यास तयार असेल, तरच त्याची पोकळ पाणीपट्टी व पोकळ पाणीपट्टीवरील विलंब आकारणीची रक्कम माफ करण्यात यावी. याबाबतचे सविस्तर आदेश अधीक्षक अभियंता यांनी काढावेत. सदर आदेश काढल्यानंतर व संस्थेने उर्वरित पाणीपट्टी भरल्यानंतरच, विभागाच्या बिगरसिंचनाच्या थकबाकीच्या खतावणी नोंदवहीमध्ये, वरील आदेशाचा उल्लेख करुन ही रक्कम कमी करण्याची कार्यवाही कार्यकारी अभियंता यांनी करावी. सदर कार्यवाही ही ६ महिन्यांच्या मुदतीत पूर्ण करावी.

याव्यतिरिक्त खालील अटींचीदेखील पूर्तता करण्यात यावी.

१. दिनांक १ एप्रिल, २०१० पूर्वी जर पोकळ पाणीपट्टीची रक्कम भरली असेल तर अशा सिंचन व बिगरसिंचन लाभधारकांना सदर रकमेचा परतावा देय होणार नाही.

२. सदर सवलत शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून एक वर्षासाठीच लागू असेल. यासाठी शेतक-यांनी व बिगरसिंचन पाणी वापरणा-या संस्थांनी स्वतंत्रपणे अर्ज करण्याची आवश्यकता नाही.

३. बिगरसिंचन पाणी वापराबद्दल लाभधारकांनी विहित मसुद्यात व मार्गदर्शक सूचनांप्रमाणे करारनामा करणे बंधनकारक राहील.

४. ज्या लाभधारकांनी पाणी अर्ज न करता अनधिकृत सिंचन केले आहे, मंजूर क्षेत्रापेक्षा जादा क्षेत्र भिजविलेले आहे किंवा ज्यांना थकबाकी सोडून इतर कारणांसाठी मंजूरी नाकारली आहे, अशा प्रकारच्या बिनाअर्जी अनधिकृत सिंचन केलेल्या लाभधारकांनासुध्दा वरीलप्रमाणे सवलत अनुज्ञेय राहील.

५. सर्व लाभधारक शेतकरी तसेच सहकारी पाणीवापर संस्था यांना उपरोक्त सवलती लागू असतील.

६. वरीलप्रमाणे बिगरसिंचन पाणीपट्टी थकबाकीची रक्कम भरल्यानंतरच, बिगरसिंचन लाभधारकांचे नाव थकबाकीदारांच्या यादीतून काढले जाईल.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २३४/ व्यय-१२, दिनांक ७-७-२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०२२८१६१७१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(सं. दे. कुलकर्णी)**
**शासनाचे उप सचिव.**

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव.
मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव.
सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
मुख्य सचिव.
कार्यासन व्यय-१२, वित्त विभाग.
सर्व मंत्रालयीन विभाग.
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग.
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
निवडनस्ती कार्यासन सिं व्य धोरण.